ब्रॉड बॅण्ड कनेक्शनचे देयकासाठी बी.एस.एन.एल. कंपनीला निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-१५१८/प्र.क्र.१४/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक:- २७ नोव्हेंबर, २०१८

**वाचा :-**

१) शासन पत्र क्रमांकः ईगव्ह-१५१७/प्र.क्र.२१/संगणक, दि. ६.११.२०१७
२) शासन पत्र क्रमांकः ईगव्ह-१५१८/प्र.क्र.१४/संगणक, दि. २१ मार्च, २०१८.
३) शासन निर्णय क्रमांक:ईगव्ह-१५१७/प्र.क्र.२१/संगणक, दि.२७ सप्टेंबर, २०१७.
४) शासन निर्णय क्रमांक:ईगव्ह-१५१८/प्र.क्र.१४/संगणक, दि.१३ ऑगस्ट, २०१८.
५) आयुक्त शिक्षण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शिआ/२०१८/ई गव्हर्नन्स/बीएसएनएल/ आस्था क १४३/५९५०, दिनांक १ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

ई-गव्हर्नन्स योजनेअंतर्गत शालार्थ प्रणाली, सरल प्रणाली, संच मान्यता, वैयक्तिक मान्यता, समायोजन, युडाईस, बिम्स, आरटीई अंतर्गत २५% प्रवेश इत्यादी साठी शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या राज्यस्तरीय कार्यालयापासून ते तालूकास्तरापर्यंतच्या क्षेत्रीय कार्यालयांसाठी ब्रॉड बॅण्ड कनेक्शन बी.एस.एन.एल. कंपनीने उपलब्ध करुन दिलेले आहे. त्यानुषंगाने ब्रॉड बॅण्ड कनेक्शनच्या शुल्काकरीता बी.एस.एन.एल. ला निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

ब्रॉड बॅण्ड कनेक्शनचे देयकासाठी बी.एस.एन.एल. ला द्यावयाची रक्कम खालील तत्क्यात देण्यात आली आहे.

| अ.क्र. | कंपनीचे नाव | देयक कालावधी | देयकाची एकूण रक्कम |
|---|---|---|---|
| १. | बी.एस.एन.एल. ला | सन २०१८-२०१९<br>(दि.०१.१०.२०१८ ते ३१.०३.२०१९) | रु. ५८,२५,७३४/- |
| | | एकूण:- | रु.५८,२५,७३४/- |

(अक्षरी रुपये अठ्ठावन्न लाख पंचवीस हजार सातशे चौतीस फक्त)

बी.एस.एन.एल. ला रुपये ५८,२५,७३४/- इतकी रक्कम अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०१८-१९ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व शिक्षण संचालक, (माध्य.व उच्च माध्य. ) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच दि.१९.११.२०१८ रोजी झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२७१२३०५४१९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2018.11.27 17:34:04 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**<u>प्रत :-</u>**

१) अ.मु.स., वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२) अ.मु.स., शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्विय सहायक मंत्रालय, मुंबई.
३) प्र.स., माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) निवडनस्ती/संगणक.